इंडियन प्रिमीयर लीग (आयपीएल) अंतर्गत महाराष्ट्र क्रिकेट असोसिएशन इंटरनॅशनल स्टेडीयम, गहुंजे, पुणे येथे आयोजित क्रिकेट सामन्यांकरिता इंटरनेटद्वारे तिकीट आरक्षण करुन प्रत्यक्ष तिकीट केंद्रावर संगणकीकृत तिकीट विक्रीस तसेच थेट तिकीट विक्रीस मान्यता देणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः ईएनटी-२०१५/प्र.क्र.६५/टी-१

पहिला मजला, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२.
तारीख: १७ मार्च, २०१५

**प्रस्तावना**

मौजे गहुंजे, पुणे येथील महाराष्ट्र क्रिकेट असोसिएशन इंटरनॅशनल स्टेडीयम, येथे बोर्ड ऑफ कंट्रोल फॉर क्रिकेट इन इंडिया (बी.सी.सी.आय) द्वारे दि. १० एप्रिल, ते १८ एप्रिल, २०१५ या कालावधीमध्ये होणाऱ्या इंडियन प्रिमियर लीग अंतर्गत क्रिकेट सामन्यांकरिता मे. केपीएच ड्रीम क्रिकेट प्रा. लि. (किंग्ज इलेव्हन पंजाब) यांची अधिकृत अभिकर्ता (franchisee) म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे.

या आयपीएल सामन्यांकरिता इंटरनेटद्वारे तिकीट आरक्षण करुन संगणकाद्वारे तसेच प्रत्यक्ष तिकीट केंद्रावर संगणकीकृत तिकीट विक्री तसेच थेट तिकीट विक्री करण्याकरिता मे. केपीएच ड्रीम क्रिकेट प्रा. लि. (किंग्ज इलेव्हन पंजाब) या अभिकर्ता कंपनीने शासनास विनंती केली आहे. सदर मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

मौजे गहुंजे, पुणे येथील महाराष्ट्र क्रिकेट असोसिएशन इंटरनॅशनल स्टेडीयम, येथे दि. १० एप्रिल, ते १८ एप्रिल, २०१५ या कालावधीमध्ये इंडियन प्रिमियर लीग अंतर्गत क्रिकेट सामन्यांकरिता मे. केपीएच ड्रीम क्रिकेट प्रा. लि. (किंग्ज इलेव्हन पंजाब) या अभिकर्ता संस्थेस इंटरनेटद्वारे तिकीट आरक्षण करण्यास व तिकीट विक्री केंद्रावर संगणकीकृत तिकीट तसेच थेट तिकीट विक्रीस उपलब्ध करुन देण्यास पुढील कार्यपध्दतीचा अवलंब करण्याच्या अटीवर मान्यता देण्यात येत आहे.

**I आयपीएल सामन्यांची तिकीट विक्री** -

i. आयपीएल तिकीट सामन्यांच्या तिकीट विक्री केंद्रामध्ये प्रत्यक्ष तिकीट उपलब्ध करुन देण्याकरिता प्रत्येक रोलमध्ये २५० तिकीटे अथवा त्या पटीत तिकीटे असावीत. प्रत्येक तिकीटावर शासनाने विहित केल्यानुसार मुद्रित करावयाच्या मजकूराशिवाय प्रायोजकांचे नाव व लोगो याची छपाई करण्याची मुभा राहील.

ii. तिकीट विक्री करण्याकरिता व्यवस्था असलेल्या प्रत्येक विक्री केंद्राकरिता स्वतंत्र संकेतांक असावा. तिकीटावर "ए" टू "झेड" या अक्षरांनी सुरु होणारी मालिका असावी.

iii. तिकीट विक्री करणाऱ्या संस्थेने प्रत्येक तिकीटाची छपाई तीन भागात करावी. तिकीटाच्या डावीकडून पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या भागावर अनुक्रमे ऑडीटकरिता असलेल्या तिकीटाच्या भागावर "**ए",** दरवाजावर असलेल्या व्यक्तीकडे ठेवण्यात येणाऱ्या तिकीटाच्या भागावर **"डी"**, व प्रेक्षकांकडे असणाऱ्या तिकीटाच्या भागावर **"पी**" अशी अद्याक्षरे छापण्यात यावीत.

iv. प्रत्येक तिकीटावर सिरीयल नंबर, रोल नंबर, तिकीटधारकाने प्रवेश करावयाची प्रवेशद्वार, प्रवेश शुल्क, ऑनलाईन तिकीटाकरिता आकारण्यात आलेला सेवाआकार / कन्व्हेनियन्स चार्ज तसेच एकूण प्रवेश शुल्कावर देय करमणूक शुल्क या बाबींचा उल्लेख करण्यात यावा.

v. तिकीटाचे ऑनलाईन आरक्षण करणाऱ्या व्यक्तीस संकेतांक देऊन त्या व्यक्तीने सदर संकेतांक तसेच ओळखपत्र तिकीटविक्री केंद्रावर उपलब्ध करुन दिल्यास त्याला आरक्षित केलेले तिकीट उपलब्ध करुन देण्यात यावे.

vi. प्रत्येक तिकीट धारकास तिकीटावर नमूद प्रवेशद्वारातूनच स्टेडियममध्ये प्रवेश देणे आवश्यक असून तिकीटधारकाने आरक्षित केलेल्या जागेवर जाण्याकरिता त्याला एका यंत्राच्या समोरुन जाणे आवश्यक असल्याने याकरिता तिकीटावर बार कोड देण्यात यावा. तिकीटाच्या तीन भागांपैकी प्रथम भाग स्टेडीयममध्ये आत जाताना सुरक्षा रक्षकास संबंधित व्यक्तीने उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील.

vii. महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियम १९२३ चे कलम कलम ४ (२) (ब) नुसार अभिकर्त्याने संगणकीकृत तिकीट विक्री करण्याकरिता संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडून तिकीटाचा नमूना प्रमाणित करुन घ्यावा. तसेच तिकीटाकरिता वापरण्यात येणारा रोल करमणूक शुल्क अधिकाऱ्यांमार्फत दिनांक व स्वाक्षरीसह मुद्रांकिंत करुन प्रमाणित करुन घ्यावा.

viii. तिकीट विक्रीकरिता तसेच कायदा व सुव्यवस्थेच्या दृष्टीकोनातून तिकीट विक्री केंद्रास मान्यता देण्याकरिता संबंधित सक्षम पोलीस प्राधिकाऱ्यांची आवश्यक मान्यता घेण्यात यावी.

II <u>आयपीएल सामन्यावर देय करमणूक शुल्क -</u>

i. मौजे गहुंजे, पुणे येथील महाराष्ट्र क्रिकेट असोसिएशन इंटरनॅशनल स्टेडियमवर होणाऱ्या प्रत्येक आयपीएल सामन्याकरिता ३७,४९० इतक्या संपूर्ण आसन क्षमतेवर महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियम, १९२३ चे कलम ३(१)(ब) मधील तक्त्यात “इतर क्षेत्राकरिता” विहित दराने करमणूक शुल्क लागू होईल.

ii. आयपीएल सामन्यांच्या ऑनलाईन तिकीट विक्रीकरिता प्रती तिकिट कमाल रू. १०/- पर्यंत सेवाआकार / कन्व्हेनियन्स चार्ज आकारल्यास त्यावर करमणूक शुल्क लागू होणार नाही. या निश्चित सेवाआकार / कन्वहेनियन्स चार्जच्या रकमेव्यतिरिक्त अधिकची रक्कम सेवाआकार / कन्वहेनियन्स चार्ज म्हणून आकारल्यास अशा आकाराचा स्वतंत्र उल्लेख तिकीटावर करण्यात यावा.

iii. तिकीटावरील प्रवेशशुल्क तसेच रु. १०/- एवढा निश्चित सेवाआकार / कन्वहेनियन्स चार्ज वगळून उर्वरित सेवाआकाराची / कन्वहेनियन्स चार्जची रक्कम अशा एकूण रकमेवर महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियम १९२३ मधील कलम ३(१)ब मधील तक्त्यात “इतर क्षेत्राकरिता” विहित दराने करमणूक शुल्क आकारण्यात येईल. ऑनलाईन तिकीटविक्रीबाबतचे स्वतंत्र विवरण प्रत्येक आयपीएल सामना संपल्यानंतर पुढील दोन कार्यालयीन दिवसात जिल्हाधिकारी कार्यालयास उपलब्ध करुन देणे व अनुज्ञेय करमणूक शुल्काचा भरणा करणे अभिकर्ता यांना अनिवार्य राहील.

iv. प्रत्येक सामन्यांपूर्वी किमान एक दिवस अगोदर स्टेडियमच्या एकूण आसनक्षमतेच्या प्रमाणात देय करमणूक शुल्का एवढी अनामत रक्कम अभिकर्त्याने जिल्हाधिकारी, पुणे यांच्याकडे जमा करणे बंधनकारक राहील.

v. जमा होणारा करमणूक शुल्क जिल्हाधिकारी पुणे यांनी "००४५, विक्रेय वस्तू व सेवा यावरील इतर कर व शुल्क, उपशिर्ष १०१" या लेखाशिर्षाखाली जमा करावा. अभिकर्त्याने भरणा केलेल्या अनामत रक्कमेतून शासनास देय करमणूक शुल्क समायोजित करुन उर्वरित रकमेचा परतावा लेखाहिशोब सादरीकरणानंतर ४ आठवडयांमध्ये संबंधितांना करण्यात यावा.

vi. आयपीएल सामन्यांकरिता तिकीट विक्री न झालेल्या तिकीटाचे उर्वरित रोल जिल्हाधिकारी, पुणे यांच्या कार्यालयात त्याच दिवशी जमा करण्यात यावेत. तसेच प्रत्येक सामन्याचे लेखाहिशोब अभिकर्त्याकडून जिल्हाधिकारी, पुणे यांना मालिकेचा शेवटचा सामना संपल्यानंतर पाच कामकाजाच्या दिवसात सादर करण्यात यावेत.

vii. सर्व तिकीटांचे स्थळप्रती (counterfoil) सामने संपल्यानंतर २ महिने कालावधीकरिता जतन कराव्या. तद्नंतर सदर स्थळप्रतीचे नाशन संबंधित करमणूक शुल्क निरिक्षक यांनी स्वत:च्या उपस्थितीत करुन घेऊन नोंदवहीत दिनांकित स्वाक्षरी करावी.

viii. महाराष्ट्र क्रिकेट असोसिएशनच्या (एम.सी.ए.) कॉर्पोरेट बॉक्समधील एकूण २६० आसनांकरिता त्यांनी जिल्हाधिकारी, पुणे यांना भाडेकराराच्या नोंदणीकृत प्रती उपलब्ध करुन द्याव्यात. जिल्हाधिकारी, पुणे यांनी सदर भाडेकराराची शहानिशा मुद्रांक शाखेमार्फत करुन करार योग्यरीत्या नोंदणीकृत असल्यास प्रत्येक १ वर्षाच्या कराराकरीता आकारण्यात येणाऱ्या रकमेवर विहित दराने करमणूक शुल्क आकारावे.

सदर करमणूक शुल्काचा भरणा एम.सी.ए. यांनी केल्यानंतर पुढील १ वर्षामध्ये सदर ठिकाणी होणाऱ्या एकदिवशीय आंतरराष्ट्रीय, आयपीएल व तत्सम क्रिकेट सामन्यांकरिता या कॉर्पोरेट बॉक्समधील आसनांसाठी जिल्हाधिकारी यांनी स्वतंत्रपणे करमणूक शुल्क आकारु नये. सदर करार ग्राह्य धरण्यास काही अडचण असल्यास जिल्हाधिकारी, पुणे यांनी या कॉर्पोरेट बॉक्सच्या निकटवर्ती आसनांकरीता आकारण्यात

येणारे प्रवेश शुल्क विचारात घेऊन त्यानुसार कॉर्पोरेट बॉक्समधील आसनाचे प्रवेशशुल्क निश्चित करावे व त्यावर देय करमणूक शुल्क परिगणित करुन भरणा करुन घ्यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१७१२१४५४८११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vidya Ramappa Hampayya

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
DN: CN = Vidya Ramappa Hampayya, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Undersecretary
Date: 2015.03.17 13:25:49 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत, तातडीच्या आवश्यक कार्यवाहीकरिता,**

अप्पर जिल्हाधिकारी, पुणे

**प्रत माहितीसाठी,**

१) विभागीय आयुक्त, पुणे
२) जिल्हाधिकारी, पुणे
३) प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा, लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५) श्री. एल. सी. गुप्ता, चिफ फायनान्शियल ऑफीसर, केएचपी ड्रीम क्रिकेट प्रा. लि. सर्वे नं. १५/१६, सेंट्रा मॉल, इंडस्ट्रियल एरिया, फेज १, चंदिगढ १६०००२.
६) टी-१ कार्यासन, महसूल व वन विभाग,